# वांगारी मथाई

## एक कोटी झाड लावणारी महिला



# वांगारी मथाई

## एक कोटी झाड लावणारी महिला

फ्रॉक प्रीवोट



असं वाटतं की वांगारी मथाई अजूनही जिवंतं आहेत, कारण त्यांनी लावालेली झाडं अजूनही जिवंतं आहेत आणि मोठी होत आहेत. मथाई सारखं ज्यांचं पृथ्वीवर प्रेम असेल त्यांना मथाईचा संदेश हा - किकू, स्वाहिली, इंग्रजी आणि जर्मन – या चारही भाषांतू ऐकू यावा.



वांगारीने आपल्या आयुष्यात गांवातल्या सर्व महिलांना प्रोत्साहित केलं. लाल मातीत त्यांनी खड्डे खणले – आणि त्यात त्यांनी आशेचं बीज लावलं – ज्याचं उद्या जंगल व्हावं.





मोठ्या पानांची आबनूस झाडं किंवा आफ्रिकन ट्युलीपची झाडं लावताना वांगारीला स्वत:च्या बालपणाची आठवण व्हायची. वांगारीचा जन्म १९४० साली ईहीथे या लहान गावात झाला. उत्तुंग अशा केनिया र्पवताच्या पायथ्याशी वसलेल्या या गावातले लोकं या र्पवताला देवच मानायचे. या वांगारीची ही गोष्ट आहे.



वांगारीच्या घराभोवतीलच्या विशाल जंगलात अनेक बोंगो हिरणं, माकडं आणि फुलपाखरं रहायची. ‘न्गारी’ नावाचे बिबट्याही या जंगलात रहायचे. वांगारीचं नाव, ‘वां – गारी’ म्हणजे बिबट्यांमधली मुलगी – म्हणूनच कदाचित वांगारींना सर्व जंगल आपले वाटतं असावे.

अंजीर आणि मोठ्या मुगमो झाडांसाठी पाणी आणायला वांगारी दररोज पायी जायची. पाच भावंडात वांगारी सर्वात मोठी बहिण असल्याने ती आईला घरात सर्व मदत करायाची – जळणासाठी लाकडं जमवणं, स्वैपक करणं, लहानं भावंडांचं करणं आणि शेतीची कामंही करणं..





वांगारीला तीची आई शेतातला एक छोटा बगीचा भेट देते. आणि वांगारी त्या जागेत खड्डे खणायला आणि झाडं लावायला शिकते. मुगमो झाडच्या मोठ्या सावलीत वांगारीची आई तीला झाडांबद्दल सांगते की ‘झाडांची खरी किंमत त्यांच्या लाकडापेक्षाही जास्त असते’ – हे वांगारी पुढे कधीही विसरत नाही.

वांगारीचे वडील सर नेयलान या ब्रिटीश ऑफिसर खाली काम करत असतात. ब्रिटीश सरकार केनीयातली सर्व चांगली जमीन बळकावते आणि मुलांना पण ख्रिश्चन नावंच द्यायला भाग पाडते. म्हणून वांगारीचं लहानपणीच नाव 'मारियम' पडत. झाडं कापून, त्यांना सर्रास विकून आणि चहाची शेती करून ब्रिटीश सरकार श्रीमंत होतं.

वांगारीला, तीने पाहिलेलं पहिलं झाडही कापताना आठवतं. पण आपल्या आवाजाने आणि शक्तीने हे सर्व बदलू शकतो हे तीला अजून माहिती नसत.





एक दिवशी वांगारीच्या मातीच्या छोट्या घरात तीचा छोटा भाऊ, नादितु, आईला विचारतो की ‘वांगारी शाळेत का जात नाही ?’

मुलींनी घरी राहून आईला मदत करायची असते आणि मग स्वत:च्या मुलांना वाढवायचं असतं हेच वांगारीला माहिती असतं. पण नादितुच्या या छोट्या प्रश्नामुळे पुढे आश्चर्यकारक बदल घडतात.

आणि मग काही दिवसातच वांगारी पण भावंडांबरोबर शाळेत जायला लागते. प्रश्न विचारणारा नादितु आणि म्हणून शाळेत घालण्याचा निर्णय घेणारी आई, यांचा वांगारीला अभिमान वाटतो. वांगारीचं आयुष्यच त्यामुळे बदलतं.

वांगारीला आसपासचं सर्व काही पहाण्याची अणि जाणून घेण्याची ओढ असते, त्यामुळे वांगारीची शाळेत चांगलीच प्रगती होते. आफ्रिकेत ज्या काळात खूप कमी मुलींना लिहीता वाचता यायचं त्या काळात वांगारीने उच्च शिक्षण मिळवते.





सेनेटर जॉन एफ. केनेडीं, जे पुढे अमेरिकेचे राष्ट्रपती होतात, ते केनीयातील सहाशे मुलींना अमेरिकेत उच्च शिक्षण घेण्यासाठी बोलवतात. वांगारी त्यातली एक विद्यार्थीनी असते.

मग पुढची पाच पर्ष वांगारीला अमेरिकेत बर्फ, गगनचुंबी इमारतींचं जंगल आणि आपल्या पेक्षा वेगळी दिसणारी लोकं पहायला मिळातात. तिथली कणसाची शेतीपण तीच्या देशा पेक्षा वेगळी असते.

पण वांगारीला लक्षात येतं की या महान आणि स्वतंत्र देशातही अनेक ठिकाणी अश्वेत लोकांना प्रवेश नसायचा. केनीया प्रमाणेच इथेही, काही शाळांमधे फक्त गोरी मुलंच अपेक्षित होती. मग १९६० च्या दशकात अश्वेत लोकांच्या समान अधिकारासाठी वांगारी लढा सुरू करते.

याच दशकात, केनीयातही लोकांच्या लढ्याला यश मिळतं आणि केनीया स्वतंत्र होतो. केनीयाची लोकं अनेक दशकं स्वत:च्या जमिनीवर शेती करायचा आणि स्वत:चा देश चालवायचा हक्क मागत असतात त्यांना आता ब्रिटनपासून स्वातंत्र्य मिळतं.

वांगारी जेव्हा केनीयात परतते तोपर्यंत ब्रिटिशांचं केनीयावरील राज्य संपलेल असतं. देश स्वतंत्र झाला असला तरीही झाडं मात्र स्वतंत्र नसतात, जगाण्यासाठी धडपडत असतात. केनीयातली लोकं झाडं सर्रास कापून ब्रिटिशांना विकत असायची. जंगलं कापून तिथे चहा, कॉफी आणि तंबाखूची शेती करायची. आणि हे सर्व श्रीमंत देशांना विकून पैसे कमावत होती.



वांगारीने मग वन्य प्राण्यांच्या अभ्यासासाठी देशभर प्रवास करते. आता जंगल-तोडीमुळे प्राणी खुप कमी दिसायचे. पैश्यासाठी शेतीपाठी लागल्यामुळे महिलांना मुलांना खायला घालायलाही घरी अन्नही मिळायचं नाही. झाडं तोडल्याने सर्व सुपिक मातीही वाहून गेलेली आणि नद्या प्रदूषित झालेल्या. वांगारीला देशाचं होणारं असं नुकसान पाहून धक्का बसतो.



या प्रवासात अनेक लोकांना भेटल्यानंतर वांगारीला आपल्या अभ्यासाचा कसा उपयोग होऊ शकतो याची कल्पना येते. ती मग जगभरच्या नेत्यांना आणि केनीयातल्या शेतकरी लोकांनाही देशासाठी जंगलाचं अस्तित्व कसं महत्वाचं आहे हे शिकवायचं ठरवते. हजारो झाडं लावल्याने – गरीब आणि श्रीमंत, महिला आणि पुरूष, श्वेत आणि अश्वेत या र्सवांचच भलं होणार आहे हे सांगायचं ठरवते.

झाडाची किंमत ही त्याच्या लाकडाहूनही जास्त असते - ही वांगारीला तीच्या आईची शिकवण लक्षात असते. झाड हे एक खजीना असतं – ते सावली देतं, फळं देतं, हवा शुद्ध करतं, पक्षांना रहायला जागा देतं, किटकांना वाढवतं आणि कवींनाही स्फुर्ती देतं. झाड हे एका अर्थी आपलंच आयुष्य आणि भविष्य असतं.

वांगारीला जरी जग बदलण्याची घाई असली तरी जगात बदल व्हायला वेळ लागतो. वांगारी १९७७ साली ‘ग्रीन बेल्ट’ची चळवळ सुरू करते आणि झाडं लावण्याचा सपाटा लावते.

गावो-गावी जाऊन वांगारी लोकांना झाडं, प्राणी आणि मुलांच्या भविष्याबद्दल सांगायला लागते. आज जरी परिस्थीती कठीण असली तरी लोकांना ती भविष्याचा विचार करायला सांगते. लोकांना त्यांचे प्रश्न आणि विचार त्यांच्या भाषेत मांडायला सांगते.

वांगारीचे विचार मग गावा-गावात पोचतात, र्वतमानपत्रात छापून येतात, पत्रांतून केनीयाच्या सरकार पर्यंत पोचतात, अगदी आंतरराष्ट्रीय पातळीवर पोचतात. आत्ता पर्यंत कापलेल्या लाखो झाडांना पुन्हा एकदा लावण्यासाठी वांगारीला खुप पैसा उभा करायचा असतो.



गावातल्या स्त्रीयांना हाताशी घेऊन वांगारी सर्व केनीयाभर झाडं वाढवायच्या नर्सरी उभ्या करते. प्रत्येक महिलेला झाड लावण्यासाठी पैशांची मदत करते.

वर्षानुवर्षं झाडं कापून श्रीमंत झालेले सरकारी अधिकारी वांगारीला विरोध करतात. ज्या देशात महिलांना बोलायलाही संधी नसते त्या देशात अशा आत्मविश्वासाने बोलणारी ही कोण होते ?

वांगारीचं ठाम मत असतं की स्त्रीयांचा आत्मविश्वास हा त्यांच्या कुटूंबातच नव्हे तर त्यांच्या गावात आणि सर्व आफ्रिका खंडात महत्वाचा ठरणार. मग गप्प न राहून, सर्व महिलांना हाताशी घेऊन ही बिबट्यांची मुलगी – वांगारी लढाई पातळीवर झाडं लावायचं सुरू करते.



वांगारीचा निश्चय असतो की या पुढे एकही झाड कापलं जावू नये. राष्ट्रपती डॅनियल आराप मोई, ज्यांनी केनीयावर चोवीस वर्ष राज्य केलेलं असत, त्यांना तोंड द्यायलाही वांगारी तयार होती. राष्ट्रपती जेव्हा साठ मजली इमारत बांधण्याचा आणि नैरोबीतल्या उहुरू ऊद्यानात स्वत:चा पुतळा उभा करण्याचा घाट घालतात, तेव्हा वांगारी गाड्या अडवून आणि आंदोलन करून त्यांचा बेत हाणून पाडते.

राष्ट्रपत मोई जेव्हा कारुआच्या जंगलात इमारती भारण्याचा प्रकल्प तयार करतात, तेव्हा जंगलातील दुर्मिळ  नीळ्या माकडांना आणि पाण-डुक्करांना वाचवण्यासाठी वांगारी जगभराची मदत उभी करते आणि मग राष्ट्रपतींना तो प्रकल्प सोडून द्यायला लागतो.

वांगारीच्या अशा अनेक यशांमुळे केनीयातली लोकं तीला “असा लढा तूच एक पुरूष आहेस.” असे संबोधायला लागतात.



राष्ट्रपती डॅनियल आराप मोईंना असा विरोध करणं ही काही सोपी गोष्ट नव्हती. वांगारीचं अस्तीत्वच मोईना धोकादायक होतं. आणि तीला थांबवण्यासाठी ते काहीही करू शकतात याची वांगारीला जाणीव होती. मोईंचे  पोलिसदल विरोधकांवर गोळया झाडायलाही घाबरणार नव्हते.

सरकार वांगारीला अनेक प्रकारे त्रास देतं, तीला मारहाण करतं, तुरूंगात टाकतं. पण वांगारी लढा थांबवत नाही. तुरूंगातून सुटल्यानंतर वांगारी सरकारी हिंसे विरुद्ध आवाज उठवणं सोडत नाही. तीच्या जीवावर अनेकदा संकटं येतात तेव्हा ती केनीयातच भूमीगत होते, पण ती लढा सरकार विरुध्द लढा सुरू ठेवते.



वांगारीला केनीयात झाडांप्रमाणेच स्वतंत्र असे लोकतंत्रही उभं करायचं असतं. सर्व लोकांनी एकत्र येऊन कायदा करणं आणि काम करणं हे देश मजबूत होण्यासाठी आवश्यक आहे हे वांगारीला माहिती असतं.



वांगारीच स्वप्न असतं की एक दिवस केनीयची मुलं दाट जंगलाशेजारी, उंबराखाली, स्वच्छ पाण्यात, बेडूक आणि मास्यांबरोबर खेळू शकतील. कोणीही मुलं भुकेलेल रहाणार नाही.

जंगलं वाचवण्यासाठी करायला लागणारे कष्ट आणि लढाईची वांगारीला जाणीव असते. मग वांगारी 'पर्यावरण' पक्षाची स्थापना करते, निवडणूका लढवते, राष्ट्रपति डॅनियल आराप मोईं विरुद्ध मोर्चे काढते.



असा वाढता प्रतिकार पाहून राष्ट्रपति मोई लोकांमधे फूट पाढायला सुरूवात करतात, ज्यामुळे त्यांना लोकांवर राज्य करणं सोपं जावं.

या उलट, वांगारी लहान झाडं एकमेकांना बक्षीस देउन लोकांमधे मैत्री आणि शांतता प्रस्थापित करते. वांगारीमुळे आणि ग्रीन बेल्ट आंदोलनाने राष्ट्रपति मोईंचा हा प्रयत्न हाणून पडतो.

जशी झाडं मोठी होतात तसा लोकांमधे समजही वाढतो. वांगारी मग सैनिकांनाही झाडं लावायला हाताशी धरते.





सन २००० मधे राष्ट्रपती डॅनियल आराप मोईंची हार होते. त्यांचा पक्ष निवडणूका हरतो आणि केनीयाचे संविधानच बदललं जातं. मोई आता पुन्हा राष्ट्रपती होऊ शकत नाहीत. वांगारी स्वत: निवडून येते आणि नवीन राष्ट्रपती तीलाच पर्यावरणमंत्री बनवतात.

वांगारीला लोकं आता मामा-मिती म्हणजे ‘झाडांची आई’ असं नाव ठेवतात. पर्यावरणमंत्री असल्याने वांगारीला आता सर्व निर्णय बरोबर घेण्याची संधी मिळते. वांगारी केनीयातल्या पुरूष, महिला आणि झाडं या सर्वांना समान हक्क मिळवण्यासाठी कामाला लागते.



वांगारीने केलेल्या सुरूवातीपेक्षा अनेकपटींनी जास्त झाडं केनीयात आज आहेत. आणि केनीया आता अधिक प्रजासत्ताक देशही बनला आहे. ग्रीन बेल्ट आंदोलन आजही पर्यावरणाच्या रक्षणाचं काम करतं, जसं कोंगो पठारावरच्या जगातलं सर्वात मोठ्या जंगलाचं रक्षण.

वांगारी मथाईच्या समर्थकांनी केनीयात तीस कोटीहूनही जास्त झाडं लावली आहेत. आणि आजही केनीयात दररोज नवी झाडं लावली जातात.

पर्यावरण वाचवण्यासाठी वांगारी मथाईने केलेल्या अनेक दशकांच्या अविरत कामासाठी ८ ऑक्टोबर २००४ साली त्यांना नोबेल पारितोषिकाने संन्मानीत केलं जातं. हे पारितोषिक मिळणारी मथाई ही पहिली आफ्रिकी महिला होते. हे ऐकल्या वर वांगारी केनीया पर्वताच्या पायथ्याशी, न्येरी गावात, तीच्या घराबाहेर स्वत: एक नांदी झाड लावते.

त्या दिवशी केनीयाच्या लोकांनच नव्हे तर बिबट्यांना, बोंगो हरणांना आणि जंगलातल्या इतर प्राण्यांनाही वंगारीचा अभिमान वाटतो.

**समाप्त**

